**राज्य मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग यांना "विभागप्रमुख" घोषित करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१६/प्र.क्र.१८९/सहा,**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दि. १८ मार्च, २०१७

**संदर्भः**- १) शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.१८९/सहा, दि. १९ नोव्हेंबर २०१६

२) मा.मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांचे इंग्रजी अर्धशासकीय पत्र क्र. सीआयसी/२०१६/सं.क्र.३५/२०१६ दिनांक : ०३.१२.२०१६

**प्रस्तावनाः-**

राज्य मुख्य माहिती आयुक्त यांना संदर्भाधीन क्र.१ येथील दि.१९ नोव्हेंबर २०१६ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम,१९८१ मधील नियम ९(२२) अन्वये "विभाग प्रमुख" म्हणून घोषित करण्यात आले होते. तथापि राज्य मुख्य माहिती आयोगाच्या कामकाजाचे सर्वसाधारण अधीक्षण, संचालन व व्यवस्थापन हे राज्य माहिती आयोगाकडे निहित असेल आणि राज्य माहिती आयोगाला, माहिती अधिकार अधिनियमाखाली कोणत्याही इतर प्राधिकरणाच्या निदेशांना अधीन न राहता स्वायत्तपणे वापरता येत असतील असे सर्व अधिकार वापरता येतील आणि करता येतील अशा सर्व कृती व गोष्टी करता येतील अशी तरतूद आहे. तसेच राज्य माहिती आयुक्त कार्यालयातील सचिव यांना दि. २९.११.२००५ च्या शासन निर्णयान्वये विभाग प्रमुख म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यामुळे राज्य माहिती आयोग यांचे स्वतंत्र वैधानिक (Statutory) स्थान लक्षात घेता राज्य मुख्य माहिती आयुक्त यांना विभागप्रमुख म्हणून घोषित करणे उचित ठरत नाही, असे मा.मुख्य माहिती आयुक्तांनी त्यांच्या संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये निदर्शनास आणून दिले आहे. यास्तव शासन निर्णय दि.१९ नोव्हेंबर,२०१६ अन्वये मा. मुख्य माहिती आयुक्त यांना विभागप्रमुख म्हणून घोषित करणे विषयक आदेश रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तदनुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

संदर्भ क्र.१ येथील दि.१९ नोव्हेंबर २०१६ रोजीचा शासन निर्णय या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०३१८१५२०४७६२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shwetambari
Pravin Khade

Digitally signed by Shwetambari Pravin Khade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d2e526f024133a519abcf2dbb6bd01281beb6bf02f01c42818d29e1399ab8446, cn=Shwetambari Pravin Khade
Date: 2017.03.18 15:21:57 +05'30'

**( श्वे.प्र.खडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सचिव राज्य माहिती आयोग,मुंबई.
२) महालेखापाल-१/२(लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) महालेखापाल-१/२(लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) उपसचिव, महाराष्ट्र राज्य माहिती आयोग, अमरावती/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/नवी मुंबई/ बृहन्मुंबई
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) कोषागार अधिकारी, अमरावती/पुणे/नागपूर/ /औरंगाबाद/नाशिक/नवी मुंबई
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई.
८) वित्त विभाग कार्यासन सेवा ३/सेवा ४/सेवा ५/विनिमय.
९) निवडनस्ती कार्यासन सहा.